**श्री. ए. एन. खडसे, भावसे यांना मुख्य वनसंरक्षक व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक या पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. आयएफएस-१०२०/प्र.क्र.५०/फ-७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २५ सप्टेंबर, २०२०

वाचा :-

१) केंद्र शासनाच्या पर्यावरण व वने, मंत्रालयाचे पत्र क्र.२००१९/०१/२०००/ आयएफएस, दि. २२ डिसेंबर, २००० व दि. १८ नोव्हेंबर, २००२
२) महसूल व वन विभाग शासन ज्ञापन क्र.एएफओ-१३०८/प्र.क्र.२६०/फ-७, दि. २९ एप्रिल, २००९
३) महसूल व वन विभाग शासन ज्ञापन क्र.एएफओ-१३०६/प्र.क्र.१६७/फ-७, दि. १९ एप्रिल, २०१०
४) महसूल व वन विभाग शासन आदेश क्र.पदोन्नती-२०११/प्र.क्र.२२४/फ-७, दि. १३ जुलै, २०११
५) महसूल व वन विभाग शासन आदेश क्र.एएफओ-१३०६/प्र.क्र.१६७/फ-७, दि. २० मार्च, २०१२
६) महसूल व वन विभाग शासन ज्ञापन क्र.आयएफएस-२००९/प्र.क्र.१३८/फ-७, दि. १२ जुलै, २०१२
७) महसूल व वन विभाग शासन आदेश क्र.एएफओ-१३०८/प्र.क्र.२६०/फ-७, दि. २७ जानेवारी, २०१४
८) महसूल व वन विभाग शासन आदेश क्र.एएफओ-२०१८/प्र.क्र.०४/फ-७, दि. २८ डिसेंबर, २०१८
९) महसूल व वन विभाग शासन आदेश क्र.आयएफएस-२००९/प्र.क्र.१३८/फ-७, दि. २६ डिसेंबर, २०१९
१०) महसूल व वन विभाग शासन आदेश क्र.एएफओ-२०२०/प्र.क्र.०४/फ-७, दि. १० ऑगस्ट, २०२०
११) महसूल व वन विभाग शासन आदेश क्र.एएफओ-२०२०/प्र.क्र.०४/फ-७, दि. २५ सप्टेंबर, २०२०

**शासन आदेश-**

श्री. ए. एन. खडसे, भावसे यांच्या विरुध्द अखिल भारतीय सेवा (शिस्त व अपील) नियम, १९६९ च्या नियम ८ नुसार संदर्भ क्र. २, ३ व ६ नुसार शिस्तभंग विषयक कारवाई सुरु करण्यात आली होती. श्री. खडसे, भावसे यांच्याविरुध्द संदर्भ क्र. ३ नुसार सुरु

करण्यात आलेली विभागीय चौकशीची कार्यवाही संदर्भ क्र. ५ येथील दिनांक २० मार्च, २०१२ च्या आदेशान्वये त्यांना ताकीद देऊन संपुष्टात आली. तर संदर्भ क्र. २ नुसार सुरु करण्यात आलेली विभागीय चौकशीची कार्यवाही त्यांना संदर्भ क्र. ७ येथील आदेशान्वये “समय श्रेणीतील एक टप्पा एक वर्षाकरिता खाली आणणे” ही शिक्षा देऊन पुर्ण करण्यात आली. तसेच संदर्भ क्र. ६ नुसार सुरु करण्यात आलेली विभागीय चौकशीची कार्यवाही संदर्भ क्र. ९ येथील दिनांक २६ डिसेंबर, २०१९ च्या आदेशान्वये त्यांना ताकीद देऊन संपुष्टात आली.

२. श्री. खडसे यांचा मुख्य वनसंरक्षक या श्रेणीतील पदोन्नतीबाबत सन २०११ च्या विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीत विचार करण्यात आला होता. तथापि, त्यांच्या विरुध्द संदर्भ क्र. २ व ३ येथील शासन ज्ञापनान्वये सुरु करण्यात आलेल्या विभागीय चौकशी प्रलंबित होत्या. त्यामुळे, त्यांच्या पदोन्नती संदर्भातील पदोन्नती समितीची शिफारस सिलबंद लखोट्यात ठेवण्यात आली होती. श्री. खडसे यांना संदर्भ क्र. २ येथील आदेशान्वये “समय श्रेणीतील एक टप्पा एक वर्षाकरिता खाली आणणे” ही शिक्षा देण्यात आली. सदर शिक्षेची अंमलबजावणी दिनांक २६ जानेवारी, २०१५ रोजी पूर्ण झाली. तथापि, त्यांच्या विरुध्द त्यावेळेस संदर्भ क्र. ६ नुसार प्रस्तावित करण्यात आलेली विभागीय चौकशी प्रलंबित असल्याने सदर सिलबंद लखोट्यात ठेवण्यात आालेली शिफारस उघडण्यात आली नव्हती. सदर संदर्भ क्र. ६ नुसार प्रस्तावित करण्यात आलेली विभागीय चौकशी संदर्भ क्र. ९ नुसार संपुष्टात आणल्याने सदर सिलबंद लखोट्यातील शिफारस दिनांक १४ जानेवारी, २०२० रोजीच्या विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीत उघडण्यात आली. सदर प्रमाणे श्री. खडसे हे मुख्य वनसंरक्षक या श्रेणीत पदोन्नतीस पात्र असल्याचे दिसून आले. सदर समितीच्या शिफारशीस सक्षम प्राधिकाऱ्यांनी मान्यता दिल्यानंतर त्यांची संदर्भ क्र. १० नुसार मुख्य वनसंरक्षक श्रेणीत मुख्य महाव्यवस्थापक (औषधी वनस्पती), महाराष्ट्र वन विकास महामंडळ मर्या., नागपूर या पदावर पदोन्नतीने पदस्थापना करण्यात आली. श्री. खडसे यांना मुख्य वनसंरक्षक या श्रेणीत पदोन्नती दिल्यानंतर त्यांच्या अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक या श्रेणीतील पदोन्नती संदर्भातील सिलबंद लखोट्यात ठेवण्यात आलेली शिफारस उघडण्यात यावी असा निर्णय दिनांक १४ जानेवारी, २०२० रोजीच्या विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीत घेण्यात आला.

३. श्री. खडसे यांचे अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक या श्रेणीतील पदोन्नतीबाबत सन २०१७ च्या विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीत विचार करण्यात आला होता. तथापि, त्यांच्या विरुध्द संदर्भ क्र. ६ येथील शासन ज्ञापनान्वये सुरु करण्यात आलेली विभागीय चौकशी प्रलंबित होती. त्यामुळे, त्यांच्या पदोन्नती संदर्भातील पदोन्नती समितीची शिफारस सिलबंद लखोट्यात ठेवण्यात आली होती.

४. श्री. खडसे यांच्या मुळ अर्जा संदर्भात मा. केंद्रीय प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिनांक ०२ मार्च, २०२० रोजी दिलेले आदेश, त्यांच्या वकिलांनी सदर आदेशांच्या पुर्ततेच्या अनुषंगाने पाठविलेली नोटीस व त्यांच्या विरुध्द संदर्भ क्र. ६ नुसार प्रस्तावित करण्यात आलेली विभागीय चौकशी संदर्भ क्र. ९ नुसार संपुष्टात आणल्याची स्थिती विचारात घेऊन त्यांच्या अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक श्रेणीतील पदोन्नती संदर्भातील सन २०१७ च्या विभागीय पदोन्नती समितीची सिलबंद लखोट्यातील शिफारस उघडण्यात आली. सदर प्रमाणे श्री. खडसे हे अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक या श्रेणीत पदोन्नतीस पात्र असल्याचे दिसून आले. सदर समितीच्या शिफारशीस सक्षम प्राधिकाऱ्यांनी मान्यता दिल्यानंतर त्यांची संदर्भ क्र. ११ नुसार अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक श्रेणीत संचालक, चंद्रपूर वन विकास, प्रशासन व व्यवस्थापन अकादमी, चंद्रपूर या पदावर पदोन्नतीने पदस्थापना करण्यात आली.

५. श्री. खडसे यांना दिनांक ३० जुन, २०११ च्या निवड समितीच्या शिफारशीस अनुसरुन मुख्य वनसंरक्षक श्रेणीत संदर्भ क्र. १० च्या आदेशान्वये पदोन्नती देण्यात आली आहे. श्री. खडसे मुख्य वनसंरक्षक श्रेणीत पदोन्नतीस पात्र होते त्यावेळेस त्यांना लगत कनिष्ठ असलेले श्री. एस. पी. ठाकरे यांना संदर्भ क्र. ४ येथील दिनांक १३ जुलै, २०११ च्या आदेशान्वये मुख्य वनसंरक्षक श्रेणीत पदोन्नती देण्यात आली आहे. सदर पदाचा कार्यभार श्री. ठाकरे यांनी दिनांक ०४ ऑगस्ट, २०११ रोजी स्विकारला असल्याने श्री. खडसे यांना सदर दिनांक ०४ ऑगस्ट, २०११ हा मुख्य वनसंरक्षक या श्रेणीतील पदोन्नतीचा मानीव दिनांक म्हणून देण्यात येत आहे. श्री. खडसे यांना त्यांच्या विरुध्द दिनांक २९ एप्रिल, २००९ च्या ज्ञापनान्वये सुरु करण्यात आलेल्या विभागीय चौकशीअंती “समय श्रेणीतील एक टप्पा एक वर्षाकरिता खाली आणणे” ही शिक्षा दिनांक २७ जानेवारी, २०१४ च्या आदेशान्वये देण्यात आली. सदर शिक्षेची अंमलबजावणी दिनांक २६ जानेवारी, २०१५ रोजी पूर्ण झाली आहे. त्यामुळे, श्री. खडसे यांना उक्त मानीव दिनांकाच्या अनुषंगाने वेतन व भत्त्याची थकबाकी दिनांक २७ जानेवारी, २०१५ पासून देय होईल.

६. श्री. खडसे यांना अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक या श्रेणीत सन २०१७ च्या निवड समितीच्या शिफारशीस अनुसरुन संदर्भ क्र. ११ येथील आदेशानुसार पदोन्नती देण्यात आली आहे. श्री. खडसे यांना लगत कनिष्ठ असलेले श्री. एन. श्रीनिवास राव यांना संदर्भ क्र. ८ येथील दिनांक २८ डिसेंबर, २०१८ च्या आदेशानुसार अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक या श्रेणीत पदोन्नती दिली आहे. सदर पदाचा कार्यभार श्री. राव यांनी दिनांक ०७ जानेवारी, २०१९ रोजी स्विकारला असल्याने श्री. खडसे यांना सदर दिनांक ०७ जानेवारी, २०१९ हा अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक या श्रेणीतील पदोन्नतीचा मानीव दिनांक म्हणून देण्यात येत आहे. श्री. खडसे यांना उक्त मानीव दिनांकाच्या अनुषंगाने वेतन व भत्त्याची थकबाकी पूर्वलक्षी प्रभावाने मंजूर करण्यात येत आहे.

**७.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९२५१५०७२८००१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, cn=Arvind Shankar Apte
Date: 2020.09.25 15:08:47 +05'30'

**( अरविंद आपटे )**
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
५. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), महाराष्ट्र राज्य, नागपूर
८. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), पुणे
९. संचालक, चंद्रपूर वन विकास, प्रशासन व व्यवस्थापन अकादमी, चंद्रपूर
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर
११. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर
१२. कोषागार अधिकारी, चंद्रपूर
१३.श्री. ए. एन. खडसे, भावसे
१४.कक्ष अधिकारी (फ-७ अ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.सहाय्यक संचालक (भावसे लेखा), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६.निवडनस्ती, फ-७.